मुंबईतील कापड गिरण्यांची जमीन विक्री व
विकास यासंदर्भात स्थापित संनियंत्रण समितीच्या
अध्यक्ष पदावरील नेमणूकीबाबत.

**महाराष्ट्र शासन,**
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
शासन निर्णय क्रमांक : एनटीसी २००९/प्र.क्र. १०३/टेक्स-३,
दिनांक :- ९ मार्च, २०१०.

**वाचा :** १) शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग क्र. मुमंस २०००/९२३/ प्र.क्र.२३१/टेक्स-३, दि. २९.१२.०१.
२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. मुमंस २०००/९२३/ प्र.क्र. २३१/टेक्स-३, दि. १९ मे, २००३.
३) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. एनटीसी २००७/ प्र.क्र. ४०/टेक्स-३, दि. २०.६.०७.
४) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. एनटीसी २००९/ प्र.क्र. १०३/टेक्स-३, दि. २३.६.०९.
५) महाप्रबंधक, मुंबई उच्च न्यायालय यांचे क्र. A.१२१५/२००७, दि. १२ जानेवारी, २०१० चे पत्र.

**प्रस्तावना :-**

बृहन्मुंबई विकास नियंत्रण नियमावलीच्या नियम ५८ (९) नुसार संदर्भिय शासन निर्णय दिनांक २९ डिसेंबर, २००१ अन्वये मुंबई उच्च न्यायालयाचे सेवानिवृत्त न्यायाधीश श्री.बी.व्ही.चव्हाण यांच्या अध्यक्षतेखाली संनियंत्रण समिती गठीत करण्यात आली असून, संदर्भिय दिनांक १९ मे, २००३ च्या आदेशान्वये या समितीचे पुनर्गठन करण्यात आले आहे. त्यास अनुसरुन संदर्भीय शासन निर्णय दिनांक २३ जून, २००९ अन्वये मुंबई उच्च न्यायालयाचे सेवानिवृत्त न्यायाधीश श्री.बी.व्ही.चव्हाण यांची संनियंत्रण समितीच्या अध्यक्ष पदावर दि. २० जून, २००९ पासून पुढील ३ वर्षासाठी नियुक्ती करण्यात आली आहे. मात्र त्यांचा अध्यक्ष पदावरील कार्यकाल पूर्ण होण्यापूर्वीच त्यांनी त्यांच्या दि. २ जुलै, २००९ च्या पत्रान्वये राजीनाम्याची सूचना दिलेली आहे. त्यामुळे सदर समितीवर अध्यक्ष म्हणून नियुक्ती करण्यासाठी मुंबई उच्च न्यायालयाच्या अन्य सेवानिवृत्त न्यायाधिशांची शिफारस करण्याबाबत मुंबई उच्च न्यायालयास विनंती करण्यात आली होती. त्यास अनुसरुन मा. मुख्य न्यायाधीश मुंबई उच्च न्यायालय, मुंबई यांनी त्यांचे संदर्भाधीन क्र. ५ येथील पत्रान्वये श्री. एस.एस.पारकर, मुंबई उच्च न्यायालयाचे सेवानिवृत्त न्यायाधीश यांच्या नावाची शिफारस केलेली आहे. त्यानुसार श्री. चव्हाण यांचा राजीनामा मंजूर करुन त्यांचे जागी श्री. पारकर यांची नियुक्ती करण्याबाबत सर्वंकष विचार करुन खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय** :

श्री. बी.व्ही.चव्हाण, मुंबई उच्च न्यायालयाचे न्यायाधीश यांचा मुंबईतील कापड गिरण्यांची जमीन विक्री व विकास या संदर्भात स्थापित संनियंत्रण समितीच्या अध्यक्ष पदाचा दि. २ जुलै, २००९ रोजी दिलेला राजीनामा आज दि. ९ मार्च, २०१० (म.नं.) पासून मंजूर करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. श्री. चव्हाण यांच्या राजीनाम्यामुळे रिक्त झालेल्या अध्यक्ष पदावर श्री. एस.एस.पारकर, मुंबई उच्च न्यायालयाचे सेवानिवृत्त न्यायाधीश यांची सदर आदेशाच्या दिनांकापासून पुढील तीन वर्षासाठी नियुक्ती करण्यात येत आहे.

३. सदर समितीची कर्तव्ये व जबाबदा-या तसेच समितीचे अध्यक्ष यांना अनुज्ञेय सोयी-सुविधा संदर्भीय दिनांक २९.१२.२००१ मध्ये नमूद केल्यानुसार राहतील.

४. सदर समितीचे अन्य सदस्य संदर्भीय शासन निर्णय दि. १९ मे, २००३ अन्वये पुनर्गठीत कल्यानुसार कायम राहतील.

५. प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१००३१११४२८५१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

( र. मो. आडे )
महाराष्ट्र शासनाचे अवर सचिव.

प्रत -

१. श्री.एस.एस. पारकर, सेवानिवृत्त न्यायाधीश, १००२, अवंती अपार्टमेंट, के. गांधी नगर, एल.आर. पपन मार्ग, डॉ. इ. मोजेस मार्ग, वरळी, मुंबई- ४०० ०१८.
२. श्री. बी.व्ही. चव्हाण, सेवानिवृत्त न्यायाधीश, ४०२ असीम, प्लॉट क्र.२३७, जयंत पालकर मार्ग, वरळी, मुंबई ४०० ०२५.
३. अप्पर मुख्य सचिव (नगर विकास), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई.
५. प्रधान सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव (कामगार), उद्योग, ऊर्जा व कामगर विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव (उद्योग), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव (गृह निर्माण ), गृहनिर्माण व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. कामगार आयुक्त, कॉमर्स सेंटर, ताडदेव, मुंबई.
१०. प्रमुख अभियंता (विकास नियोजन), बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई.
११. मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
१२. खाजगी सचिव ( मा. मंत्री (वस्त्रोद्योग) / मा. मंत्री (कामगार)/ मा. मंत्री (गृहनिर्माण) / मा. मंत्री (उद्योग) ) मंत्रालय, मुंबई.
१३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वस्त्रोद्योग महामंडळ म., मुंबई ४०० ०२०.
१४. अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, राष्ट्रीय वस्त्रोद्योग महामंडळ मर्या., एनटीसी हाऊस, बॅलार्ड इस्टेट, १५ एन.एम.मार्ग, मुंबई ३८.
१५. निवड नस्ती टेक्स-३.